**जम्मू काश्मिर राज्यातील पेहेलगाम येथे दहशतवादी हल्ल्यात महाराष्ट्र राज्यातील जखमी झालेल्या व्यक्तींना व मृत पावलेल्या व्यक्तींच्या वारसास आर्थिक मदत देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- आरएलएस-२०२५/प्र.क्र.८९/म-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २३ एप्रिल, २०२५

**वाचा :-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. आरएलएफ-११-०३/प्र.क्र.३१०/म-३,दि.२४.०८.२००४
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. आरएलएफ-१२-०८/प्र.क्र.२९८/म-३,दि.०१.१२.२००८

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्यातील पुणे, रायगड, ठाणे, मुंबई व नागपूर या जिल्ह्यांतील काही पर्यटक जम्मू काश्मिर राज्यातील पेहेलगाम येथे पर्यटनासाठी गेलेले होते. दि.२२.०४.२०२५ रोजी पेहेलगाम येथे झालेल्या दहशतवादी हल्ल्यात जखमी झालेल्या व्यक्तींना व मृत पावलेल्या व्यक्तींच्या वारसास आर्थिक मदत देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आलेला आहे.

**शासन निर्णय :-**

जम्मू काश्मिर राज्यातील पेहेलगाम येथे दि.२२.०४.२०२५ रोजी दहशतवादी हल्ल्यात महाराष्ट्र राज्यातील ७ व्यक्ती जखमी झालेल्या आहेत व ६ व्यक्ती मृत पावलेल्या आहेत.

सदर ६ मृत पावलेल्या व्यक्तींच्या वारसांना प्रत्येकी रु.५.०० लक्ष (अक्षरी रूपये पाच लक्ष फक्त) इतकी रक्कम आर्थिक मदत म्हणून संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात येत आहे.

तसेच ७ जखमी व्यक्तींना प्रत्येकी रु.५०,०००/- (अक्षरी रूपये पन्नास हजार फक्त) इतकी रक्कम विशेष बाब म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

२. या बाबीवर होणारा खर्च मागणी क्र.सी-५, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण ६० इतर सामाजिक सुरक्षा कल्याण कार्यक्रम - २०० इतर कार्यक्रम, (०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य (०१) (०५) दहशतवादी हल्ल्यात झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य (अनिवार्य), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२३५बी३८१) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध निधीतून अथवा पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४२३१७४६०८२५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2025.04.23 17:47:25 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत माहितीसाठी अग्रेषित**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा. उपमुख्यमंत्री (वित्त/नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. मंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव
५) मा. मंत्री, आपत्ती व्यवस्थापन यांचे खाजगी सचिव
६) मा. राज्यमंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव
७) महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
८) महालेखापाल १/२, (लेखा व परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
९) मा.अपर मुख्य सचिव, मदत व पुनर्वसन यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१०) सबंधित जिल्हाधिकारी
११) संबंधित जिल्हा अधिदान अिधिकारी
१२) वित्त विभाग (व्यय-९/) मंत्रालय, मुंबई
१३) कार्यासन ब-१, म-११, म-७ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) निवड नस्ती (म-३)